साक्षर भारत योजनेकरिता सन २०२१-२२ च्या मंजूर तरतूदीतून खर्च करण्यासाठी प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः साभाका-०२२२/प्र.क्र.१९/एस.डी.२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च, २०२२

**संदर्भ:-** १) केंद्र शासनाच्या मनुष्यबळ विकास मंत्रालय व शालेय शिक्षण व साक्षरता विभागाचे क्र.९-८/२०१४-NLM-१, दि. ७ मार्च, २०१९ चे पत्र.
२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. बीयुडी-२०२१/प्र.क्र.०४/कार्यासन-६, दि.३१ मार्च, २०२२

**प्रस्तावना:-**

साक्षर भारत योजना ही योजना राज्यात जानेवारी, २०१० पासून सुरु करण्यात आली होती. सन २००१ च्या जनगणनेनुसार ज्या जिल्हयातील महिला साक्षरतेचे प्रमाण ५०% पेक्षा कमी आहे, अशा राज्यातील १० जिल्हयांचा समावेश साक्षर भारत योजनेत करण्यात आला आहे. या योजनेसाठी सन २०१५-१६ पासून केंद्र व राज्याच्या हिश्याचे प्रमाण६०:४० असे करण्यात आले होते. या योजनेखाली तालुका व जिल्हा स्तरावरील समन्वयक व १० जिल्हयातील प्रेरकांना देय मानधनापैकी ४२ महिन्यांचे मानधन अदा करणे बाकी होते.

केंद्र शासनाने सन २०१८-१९ मध्ये या योजनेखाली क्र.१ येथील आदेशान्वये रु.१,९२,०४,४५८/- इतकी तरतूद आदिवासी घटक योजनेखाली मंजूर केली होती.

साक्षर भारत योजनेंतर्गत आदिवासी घटक कार्यक्रमांकरिता केंद्र हिस्सापोटी रु.१००.०० लाख व राज्य हिस्सा रु.५०.०० लाख असा एकूण रु.१५०.०० लाख(रुपये एक कोटी पन्नास लाख फक्त) इतका निधी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. त्याअनुषंगाने सदरची तरतूद वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

२. वित्त विभागाच्या व आदिवासी विकास विभागाच्या मान्यतेनुसार साक्षर भारत योजनेखालील प्ररेकांचे व समन्वयकांचे मानधन मागविण्यसाठी खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे एकूण रु.१४६.०१९५८ लाख (रुपये एक कोटी सेहचाळीस लाख एक हजार नऊशे अठ्ठावन्न) निधी वितरीत करण्यात शासन मान्यता देत आहे.

| अ.क्र. | लेखाशिर्ष | सन २०२१-२२ या वर्षात अर्थसंकल्पिय तरतूद | वितरित करावयाची तरतूद |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | मागणी क्र.टी-५<br>२२०२ सर्वसाधारण शिक्षण<br>०४ प्रौढ शिक्षण<br>७९६ जाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (०१) साक्षर भारत योजना<br>केंद्र हिस्सा ६० टक्के<br>(२२०२ आय ६९३)<br>३१ सहायक अनुदाने | रु.१०० लाख | रु.९६.०१९५८ |
| २ | मागणी क्र.टी-५<br>२२०२ सर्वसाधारण शिक्षण<br>०४ प्रौढ शिक्षण<br>७९६ जाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (०१) साक्षर भारत योजना<br>राज्य हिस्सा ४० टक्के<br>(२२०२ आय ७०१)<br>३१ सहायक अनुदाने | रु.५० लाख | रु.५० लाख |
| | | **(एकूण १+२)** | **रु.१४६.०१९५८लाख** |

उपरोक्त प्रमाणे आर्थिक तरतुदीतून खर्च भागविण्यात यावा. तसेच, वितरीत निधीच्या विनियोगासंदर्भात जिल्हा निहाय, तालूका निहाय माहिती शासनास उपलब्ध करुन द्यावी.

३. यासाठी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना “नियंत्रक अधिकारी” आणि लेखाधिकारी, अल्पसंख्यांक व प्रौढ शिक्षण संचालनालय, पुणे यांना “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे. नियंत्रक अधिकारी, आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर निधी संचालक, अल्पसंख्यांक व प्रौढ शिक्षण संचालनालय, पुणे यांना विनियोगाकरिता तातडीने उपलब्ध करुन द्यावा.

४. सदरचा शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक:-४२३/व्यय-१४, २९.०३.२०२२, व आदिवासी विकास विभाग शासन निर्णय दि.३१ मार्च, २०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेनूसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३११२२४४४१५२२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Imtiyaz Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, serialNumber=77a529748c5e7c1ba7a66e81c654ba3c492fda5b29e076241db1ba213ddedf4e, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2022.03.31 22:48:21 +05'30'

**( इ.मु.काझी )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, (शालेय शिक्षण), मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री, (शालेय शिक्षण), मंत्रालय, मुंबई
३. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
४. मा. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
६. महालेखापाल (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९. स्थानिक निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१०. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे
११. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१२. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे
१३. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक)महाराष्ट्र राज्य, पुणे
१४. शिक्षण संचालक (अल्पसंख्यांक व प्रौढ शिक्षण ) महाराष्ट्र राज्य, पुणे
१५. वित्त विभाग (व्यय-५/अर्थसंकल्प-८) मंत्रालय, मुंबई
१६. सह सचिव/उपसचिव (विद्यार्थी विकास/अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग मंत्रालय, मुंबई
१८. निवडनस्ती, (एसडी-२).